

# हत्ती पक्षी आणि मुनिया

लेखन: **अरिफा तेहसीन**

चित्रांकन: **सोनल गोयल आणि सुमित सखूजा**

वाचन पातळी ३

Original Story in English **'The Elephant Bird'** by Arefa Tehsin

Illustrations: Sonal Goyal and Sumit Sakhuja

**'Hatti Pakshi Ani Muniya'** — Marathi translation by Neha Taksale



First Marathi Edition: 2014

ISBN: 978-81-8479-469-4

Typesetting by: Ascent Technologies, Pune
Layout by: Pratham Books, New Delhi

Printed by: Rave India, New Delhi

Published by:
Pratham Books
**www.prathambooks.org**

**Registered office:**
PRATHAM BOOKS
#621, 2nd Floor, 5th Main, OMBR Layout
Banaswadi, Bangalore 560 043
T: +91 80 42052574 / 41159009

**Regional Office:**
New Delhi
T: +91 11 41042483

**The development of this book has been supported by**








**PRATHAM BOOKS**

# हत्ती पक्षी आणि मुनिया

लेखन: **अरिफा तेहसीन**
चित्रांकन: **सोनल गोयल आणि सुमित सखूजा**
मराठी अनुवाद: **नेहा टाकसाळे**





मुनियाची मुळी खात्रीच होती की त्या मोठ्या एकपंखी हत्ती पक्ष्यानं तो घोडा गिळला नव्हता. म्हणजे घोडा गिळण्याइतका तो पक्षी मोठा जरूर होता पण याचा नक्कीच असा अर्थ नाही की त्यानं तो घोडा गिळला होता. तो पक्षी ज्या जंगलात राहायचा तिथल्याच तलावापाशी कुठेतरी वायू हरवला होता. अधानिया नावाच्या त्या खेड्यात एकच घोडागाडी होती. वायू आणि द्रुत नावाचे दोन घोडे ती चालवायचे.



त्या मोठ्या एकपंखी हत्ती पक्ष्याबद्दल, जंगलात वसलेल्या त्या छोट्या गावानं बऱ्याच पिढ्यांपासून काय काय ऐकलं होतं. लोक त्याच्यापासून चार हात लांबच राहत असत आणि तो पक्षीही त्यांच्या वाट्याला जात नसे. त्याच्या प्रजातीतला शिल्लक राहिलेला तो शेवटचा पक्षी होता. (जी शंभरहून अधिक वर्षांपूर्वी नामशेष झाली होती.) बाकीच्या जगाला मात्र हे माहितीच नव्हतं की त्या प्रजातीचा, एक जिवंत अवशेष अजूनही अधानियाच्या जंगलात भटकतोय. गावकरी आणि तो पक्षी एकमेकांपासून जरा लांबच राहायचे पण मुनियाचं मात्र तसं नव्हतं. खरं तर ती एका पायानं जरा लंगडायची पण ती शूर होती. बऱ्याच वेळा ती त्या पक्ष्याला बघायला हळूच जंगलात तलावापाशी जायची.



तो पक्षी ऊन खायला आणि पाण्यात मस्त डुंबायला सकाळी तलावापाशी यायचा. तो एकटाच पाण्यात खेळायचा किंवा नुसता पाण्यात बसून राहायचा. पण बाकी वेळी मात्र तो गायब असायचा. कदाचित जंगलातल्या कुठल्याश्या आडबाजूच्या कोपऱ्यात आराम करत असावा. तो एक पंखावला प्रचंड मोठा हत्ती पक्षी झाडाएवढा उंच होता. लांब ताठ मान, पंजा असलेले मोठे पाय आणि जड भाल्याएवढं डोकं! त्याचा लांब पंजा आणि नखं भीतिदायक दिसायची. पण मुनियाच्या लवकरच लक्षात आलं की तो एक गवत-पाला खाणारा लाजरा पक्षी होता. तो फक्त  तलावाजवळची पानं खायचा.

मुनियाला आतून असं नेहमी वाटायचं की तिच्यात आणि त्या पक्ष्यात काहीतरी साम्य आहे. तसं ते खरंच होतं म्हणा, त्या पक्ष्याला उडता येत नव्हतं आणि मुनियाला पळता! बाकीची मुलं तिच्या चालण्याची टर उडवायची, तिला खेळायला घ्यायची नाहीत. यामुळे मुनियाला एकटंच राहायला आवडायचं.



मुनियाला कधी कधी संशय यायचा. त्या मोठ्या पक्ष्याला ती जंगलात येते ते ठाऊक होतं का? कदाचित असावं कारण तो बऱ्याचदा ती जिथे लपलेली असायची त्याच दिशेला नजर टाकायचा.

मुनियाची आई सकाळी चूल पेटवायची. आईला मदत म्हणून मुनिया रोज सरपण गोळा करायची, विहिरीतून पाणी आणायची. एकदा हे काम झालं, की नंतर ती मजेत झोपडीबाहेर जायची. आईला वाटायचं की ती इतर मुलांबरोबर खेळायला गेलीय. तिला कुठे ठाऊक होतं की मुनिया जंगलात जाते, तो मोठा पक्षी राहतो तिथेच!



एकदा धाडस करून मुनिया झाडामागून बाहेर आली. मानेची हालचाल न करता त्या पक्ष्यानं मुनियाकडे एक नजर टाकली आणि मग डोळे मिटले. त्यानं तसं दुर्लक्षच केलं. डोक्यावर गुणगुणणाऱ्या माश्यांइतकंच लक्ष त्यानं मुनियाकडे दिलं असावं. हे बघून मुनियानं जोरात पाय आपटला. पाय आपटताच अचानक त्या पक्ष्यानं त्याचा एक पंजा उचलला. मुनिया घाबरून जोरात ओरडली आणि पाय घसरून बाजूच्या उथळ पाण्याच्या डबक्यात पडली. चिम्ब भिजूनच पाण्यातून बाहेर आली आणि बघते तर काय, तो पक्षी आपलं सगळं शरीर हलवून हसत होता.





''इथे काही विनोद घडलाय का?'' दातओठ खात ती म्हणाली. चिडून परत जायला निघाली. थोडं पुढे जातेय तोच तिच्या पायाला गोलाकार काहीतरी लागलं. ते एका झाडाचं पोकळ गोल फळ होतं. त्या पक्ष्याला खेळायचं होतं तर! चेंडू पकडायला त्यानं त्याचा एक पंजा उचलला. गोंधळून मुनियानं चेंडू पक्ष्याकडे फेकला. त्यानं मान वळवून तो चेंडू चोचीत पकडला.



अशा रीतीनं मुनिया आणि त्या हत्ती पक्ष्याची मस्त मैत्री झाली. मुनियाला आत्ता कुठे एक चांगला मित्र मिळाला होता पण तेवढ्यात वायू हा घोडा हरवल्याची बातमी आली. सगळ्यात वाईट गोष्ट म्हणजे सगळ्यांना त्या मोठ्या हत्ती पक्ष्याचाच संशय आला. वायूला सर्व गावकऱ्यांनी खूप खूप शोधलं. तो कुठेच दिसेना म्हटल्यावर मग शेवटी सर्वजण गावातल्या वडाच्या झाडाखाली जमा झाले. मुनियाही तिथे आली.

अधानिया इतकं छोटुसं गाव होतं की तिथे सगळे एकमेकांना ओळखायचे. त्यामुळे गावात चोरी व्हायची नाही. दूधवाल्यानं शपथेवर सांगितलं की त्यानं वायूला तलावाकडे धाव घेताना पाहिलं. पण तो तबेल्यातून कसा सुटला हे मात्र त्याला माहीत नव्हतं. वायूच्या पाऊल-खुणांवरून तो कुठे गेलाय हेही सांगणं कठीण होतं. नुकताच पाऊस पडल्यानं त्या बुजल्या होत्या.



"वायूचा तर काही पत्ता नाहीये. तबेल्याचं दार उघडं राहिलं असणार आणि जंगलातल्याच कुणीतरी त्याला नक्की खाल्लं असणार." एक आडदांड माणूस गावातल्या सरपंचाला म्हणाला. "त्या प्रचंड मोठ्या एक पंखवाल्या हत्ती पक्ष्याचंच काम असणार हे. त्याला मारून टाकायला पाहिजे." तो दूधवाला म्हणाला.



"हो हो! बऱ्याच वर्षांपासून तो शांतपणे आपलं कुटील कारस्थान रचत असणार." सगळ्यांचं एकमत झालं. मुनिया हे सगळं शांतपणे बघत होती. तिला खरंतर बोलायचं होतं पण मधे कसं बोलणार? आणि अगदी ती जरी बोलली असती तरी कुणी विश्वास ठेवला असता का तिच्यावर?

"हो, इतकी वर्षं नुसताच जंगलात राहिल्यानं तो पक्षी धोकादायक झालाय." मुनियाच्या बाबांनी दुजोरा दिला.

वर ते असंही म्हणाले "आज घोडा आहे उद्या त्या जागी आपली मुलं असतील."



बाकीच्या गावकऱ्यांचा आरडाओरडा शांत करून सरपंच बोलू लागले. "मंडळी, आपण एका प्रचंड मोठ्या हत्ती पक्ष्याचा सामना करत आहोत. पण घाबरायचं कारण नाही कारण आपण संख्येनं जास्त आहोत. यावर सगळ्यांनी ओरडून आपला पाठिंबा व्यक्त केला.

"त्या एक पंखवाल्या हत्ती पक्ष्यानं वायूला खाल्लं नाहीये" हळू आवाजात पण ठामपणे मुनिया म्हणाली. ती लंगडतच पुढे आली बोलायला. "वायू ज्या वेळी हरवला त्या वेळी मी होते त्या पक्ष्याबरोबर." अचानक सर्वत्र शांतता पसरली. "याचा अर्थ काय?" सगळेच चिडून ओरडले. "तो भला मोठा एक पंखवाला पक्षी माझा मित्र आहे आणि त्यानं कुणालाही मारलेलं नाहीये."

"वेड लागलंय या मुलीला" मागून कुणीतरी ओरडलं. बाकीची लहान मुलं यावर कुत्सितपणे हसली.



''तो फक्त पानं खातो! तो वायूला कसा खाईल?'' मुनिया आपल्या जागेवरून न हलता ओरडली.

''तुला अजून साधी स्वत:ची वेणीही घालता येत नाही आणि तू आम्हाला शहाणपण शिकवतेस?'' मुनियाचे बाबा रागानं धुमसत तिच्यापाशी आले. ''जा! तुझ्या मित्र-मैत्रिणीबरोबर खेळ.''

''पण तो हत्ती पक्षी हाच माझा एकमेव मित्र आहे'', हे ऐकून तिच्या वडिलांनी अत्यंत रागानं डोळे वटारले. पण इतकं होऊन सुद्धा मुनिया न रडता खंबीरपणे गावकऱ्यांसमोर उभी होती.

''त्या मुलीकडे दुर्लक्ष करा. आपण उद्या सकाळी त्या पक्ष्याला मारू.'' तो आडदांड माणूस म्हणाला.

''मग उद्या सकाळी ठरलं तर'' सरपंच म्हणाले आणि लोक पांगले.



मुनियाकडे फक्त एक रात्र होती. तो पक्षी निर्दोष आहे हे कसं बरं सिद्ध करावं? 'विचार कर मुनिया, विचार कर'. ती स्वत:शीच पुटपुटली. दूधवाल्यानं वायूला रस्त्यावरून तलावाकडे धावताना बघितलंय. पण तलावापर्यंत पोचण्याच्या आधी त्या रस्त्याला एक वळण आहे. तो रस्ता चान्देसारा या गावाला जातो. वायू तिथे तर नसेल गेला? असंच झालं असावं अशी मुनियाला आशा होती पण हे काही ती आपल्या बाबांना सांगू शकत नव्हती. तिचे आई-बाबा झोपताच मुनिया अंथरुणातून उठली.

हातात एक कंदील घेतला आणि घराच्या बाहेर पडली. ती गाव ओलांडून चान्देसाराला जाणाऱ्या रस्त्यापाशी आली. टु... व्हू... घुबडाचा आवाज जंगलात घुमला. दूरवर एका कोल्ह्याचा आवाज ऐकू आला. झाडांच्या हलणाऱ्या सावल्या भीतिदायक दिसत होत्या.



मुनियाचं धाडस काही होईना पुढे जायला पण मग नंतर तिनं जंगलात शांतपणे झोपलेल्या त्या पक्ष्याचा विचार केला. ती जर मागे फिरली तर उद्याची रात्र पाहायला तो पक्षी जिवंत असेल याची तिला खात्री नव्हती. तिनं दीर्घ श्वास घेऊन पुढे जायचं ठरवलं. भयाण काळोखात, लंगडत ती एकटीच चान्देसाराच्या दिशेनं चालू लागली.

दुसऱ्या दिवशी सकाळी सर्व गावकरी काठ्या, भाले, टोकदार दगड आणि घरातल्या मोठ्या सुऱ्या घेऊन जंगलातल्या तळ्यापाशी आले. तो मोठा एक पंखवाला हत्ती पक्षी शांतपणे विश्रांती घेत बसला होता. त्याच्या पंख नसलेल्या पाठीवर सूर्य चमकत होता. तो हळूच उठला आणि त्याच्या दिशेने येणाऱ्या घोळक्याकडे एकटक बघू लागला. त्याची ती भलीमोठी आकृती बघून गावकरी थबकले. पुढे जायचं की नाही असा विचार करतायत तोच सरपंच ओरडले, ''तयार व्हा मंडळी''. सगळ्यांनी एकदम जल्लोष केला आणि मग आपापली शस्त्रं हातात घट्ट पकडून पक्ष्याला मारायला निघाले.

''थांबा'' त्या गलक्यातून मुनियाचा बारीकसा आवाज आला. ती लंगडत लंगडत गावकरी आणि त्या पक्ष्याच्या बरोबर मध्ये येऊन उभी राहिली.

''मुनिया ताबडतोब मागे हो'' मुनियाचे बाबा ओरडले. ''पकडा तिला.''



मुनियाचे बाबा आणि अजून एक गावकरी तिला पकडायला धावले. तो पक्षी दोन-चार पावलं पुढे आला आणि गावकरी थबकले. ''तुझा जर का असाच हट्ट असेल तर मग आम्ही तुम्हा दोघांशी लढतो.'' तो आडदंड माणूस भाला घेऊन ओरडला.



काय चाललंय इथे? घोळक्याच्या मागून कुणीतरी ओरडलं.

वाकून चालणारा, थोडी पांढरी दाढी असलेला एक माणूस वायूला ओढत आला. ''काय चाललंय इथे?'' त्यानं पुन्हा विचारलं.

सरपंच आश्चर्यचकित होऊन म्हणाले, ''सारथी तू इथे काय करतोयस? आणि वायू तुझ्याबरोबर कसा?'' सारथी यावर म्हणाला, ''तुम्हाला माहितीच आहे की काही वर्षांपूर्वी मी तुम्हाला वायू विकला होता. काल पहाटे मी चंगू आणि मंगू (वायूचे भाऊ) यांना घेऊन तुमच्या गावातून चाललो होतो आणि कसं कुणास ठाऊक, वायू तबेल्यातून पळून आमच्या मागे मागे चान्देसाराला आला! मीही त्याला ओळखलंच नाही. मला काय करावं कळेना. आज सकाळी जेव्हा या मुलीला घरोघरी जाऊन हरवलेल्या घोड्याची चौकशी करताना पाहिलं तेव्हा लक्षात आलं. ''पण नक्की इथे चाललंय काय?'' त्यांनी आता तिसऱ्यांदा विचारलं.

गावकरी निरुत्तर झाले. लाजेनं त्यांनी माना खाली घातल्या. मुनियाचे बाबा तिच्या जवळ गेले. त्यांनी तिला खांद्यावर उचललं आणि घरी नेलं. त्या दिवसापासून कुठल्याही मुलानं मुनियाच्या लंगडेपणाबद्दल तिची टर उडवली नाही. त्या सगळ्यांनाच तिच्याशी मैत्री करायची होती पण मुनियाचा खरा मित्र मात्र तो मोठा पक्षीच राहिला. मुनियाची ही कथा पार दूरवरच्या खेडोपाड्यात पसरली. लोक आपापसात कुजबुजायचे. ''तुम्हाला माहितीये? मुनियाला ठाऊकच होतं की त्या मोठ्या एक पंखी हत्ती पक्ष्यानं घोडा गिळला नाहीये!

*एक खराखुरा 'हत्ती पक्षी' या पृथ्वीतलावर अस्तित्वात होता आणि त्यावरूनच ही गोष्ट सुचली. 'एपियॉर्निस मॅक्सिमस' हे त्या पक्ष्याचं शास्त्रीय नाव. मादागास्कर बेटावर तो होता. या बेटावरची वाढत जाणारी वस्ती आणि नष्ट होणारी जंगलं यामुळे ही प्रजाती इ.स. १७०० च्या सुमारास नष्ट झाली.*



**मुनियाला ठाऊक होतं की त्या मोठ्ठ्या हत्ती पक्ष्यानं घोडा गिळलेला नाही. म्हणजे घोडा गिळण्याइतका तो पक्षी मोठा असला तरी! मग अधानिया गावातून घोडा कसा गायब झाला? एक जादूई पक्षी आणि एक साहसी, चतुर मुलगी यांची ही कथा.**

टप्प्याटप्प्याने वाचायला शिकणे. या पुस्तकाची वाचन पातळी ३ आहे.

**प्रारंभिक वाचन / मुलांना वाचून दाखवण्यासाठी** १
वाचायला नुकतीच सुरुवात करणाऱ्या आणि गोष्ट ऐकायला आवडणाऱ्या छोटुकल्यांसाठी.

**वाचायला शिकणे** २
ओळखीचे शब्द वाचू शकणाऱ्या आणि मदत घेऊन नवे शब्द वाचणाऱ्या मुलांसाठी.

**स्वतंत्रपणे वाचन** ३
आपले आपण वाचणाऱ्या मुलांसाठी.

**सराईतपणे वाचन** ४
आत्मविश्वासानं वाचणाऱ्या मोठ्या मुलांसाठी.



**PRATHAM BOOKS**
प्रथम बुक्स ही ना-नफा संस्था असून मुलांमध्ये वाचनाची आवड रुजावी यासाठी अनेक भारतीय भाषांमध्ये पुस्तकं प्रकाशित करते.
www.prathambooks.org

The Elephant Bird
(Marathi)
MRP: ₹ 40.00

